सन २०१६-१७ करिता राज्यस्तरीय अनुसूचित जाती उप योजनेअंतर्गत संरक्षित वनाचे क्षेत्रालगत गावातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस चा पुरवठा करण्याकरिता अनुदानाचे वाटप.

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग,**

**शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१६/प्र.क्र.१६२/फ-२**

**हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा रोड**

**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**

**दिनांक :- २० मार्च, २०१७**

**वाचा** :१) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.४/फ-२, .१०.०७.२०१२

२) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.१७(१६-१७)/७२, दि.१३.०४.२०१६.

३) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१६/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.

४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफडीएम-२०१६/प्र.क्र.१०२ /फ-२, दि.२२.६.२०१६

५) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कक्ष-१/ पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.४६/२४८/१६-१७, दि.११.०५.२०१६.

६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.एफडीएम-२०१६/प्र.क्र.१६२ /फ-२, दि.०६.१०.२०१६

७) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र.अर्थसं-२०१७/प्र.क्र.८९/अर्थ-३, दि.०८.०२.२०१७.

**प्रस्तावना :-**

संरक्षित वनालगतच्या संयुक्त वन व्यवस्थापन समितीच्या सदस्यांना/ ग्रामस्थांना सवलतीच्या दराने बायोगॅस/ स्वयंपाक गॅस पुरवठा, दुभत्या जनावरांसाठी अनुदान व वृक्ष लागवडीच्या संरक्षणासाठी प्रोत्साहन देण्याबाबतची योजना संदर्भ क्र. १ येथील या विभागाच्या दि.१०.०७.२०१२ च्या शासन निर्णयान्वये राबविण्याचा निर्णय घेण्यात आलेला आहे.

२. सदरहू योजनेच्या अनुषंगाने सन २०१६-१७ या आर्थिक वर्षाकरिता अनुसूचित जाती उपयोजने अंतर्गत संरक्षित वनांलगत क्षेत्रातील गावातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना कुकींग गॅस / बायो गॅस पुरवठा करण्याकरिता रु.४०००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित असून डिसेंबर, २०१६ च्या हिवाळी अधिवेशनामध्ये रु.६००.०० लक्ष इतका निधी अतिरिक्त निधी अर्थसंकल्पित केलेला आहे. त्यामुळे सदर लेखाशीर्षाखाली आता एकूण रु.४६००.०० लक्ष इतका निधी अर्थसंकल्पित झालेला आहे.

३. सन २०१६-१७ मध्ये सदरहू योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या निधीच्या अनुषंगाने आतापर्यंत एकूण रु.३१९९.६० लक्ष इतका निधी अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना संदर्भ क्र.४ व ६ येथील शासन निर्णयान्वये वितरित करण्यात आलेला असून उर्वरीत रक्कम वितरीत करावयाची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

४. वित्त विभागाच्या दि.०८.०२.२०१७ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०१६-१७ या वर्षाकरिता महसूली खर्च शीर्षांतर्गत निधी वितरणाची मर्यादा ८० % विहित केलेली आहे. त्याअनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी संदर्भ क्र.५ येथील दि.११.०५.२०१६ रोजीच्या पत्रान्वये शासनास सादर केलेल्या प्रस्तावाच्या अनुषंगाने संरक्षित वनांलगत क्षेत्रातील अनुसूचित जातीच्या लाभार्थ्यांना एलपीजी कुकींग गॅस पुरवठा करण्याकरिता २४०६८१९५ या संकेतांकाअंतर्गत ८० % मर्यादेत उर्वरीत **रु.४८०.४० लक्ष (५० इतर खर्च)** इतका निधी प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना वितरीत करण्यास व बी.डी.एस. प्रणालीवर उपलब्ध केलेल्या अनुदानाच्या मर्यादेत खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

५. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांनी वरील अनुदान खर्च करतांना या विभागाच्या संदर्भ क्र.६ येथील दि.०६.१०.२०१६ रोजीच्या शासन निर्णयातील अटी व शर्तींची पूर्तता होईल याची दक्षता घ्यावी.

६. उपरोक्त खर्च मागणी क्र.सी-७, प्रधानशीर्ष - २४०६, वनीकरण व वन्यजीवन, १०१ वनसंरक्षण, विकास व पुनर्निर्मिती, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, अनुसूचित जाती उपयोजना, (१४) संरक्षित वनाच्या लगतच्या गावातील अनुसूचित जातीच्या कुटूंबांना कुकींग गॅस व सोलर कुकरचा पुरवठा करणे, (१४) (०१) संरक्षित वनाच्या लगतच्या गावातील अनुसूचित जातीच्या कुटूंबांना कुकींग गॅस व सोलर कुकरचा पुरवठा करणे, ५०-इतर खर्च (२४०६८१९५) या लेखाशिर्षाखालील सन २०१६-१७ या आर्थिक वर्षामध्ये उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

७. सदर शासन निर्णय, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र.२४/विघयो, दि.१५.०२.२०१७ अन्वये प्राप्त सहमतीनुसार तसेच वित्त विभागाचा संदर्भ क्र.३ व ७ येथील शासन परिपत्रकान्वये आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.०४.२०१५ भाग पहिला, उपविभाग-३, परिच्छेद २७ (२) अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३२०१५३४१३२९१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Dattatray Laxman Thorat

Digitally signed by Dattatray Laxman Thorat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Revenue And Forest Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e99493394e30f531116ee97373b411b529e251aecc25fd9c455defa0031292a7, cn=Dattatray Laxman Thorat
Date: 2017.03.20 15:42:18 +05'30'

**(डी.एल.थोरात)**
सह सचिव, महसूल व वन विभाग

**प्रत :-**

१) प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय मुंबई
२) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
३) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) / (उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर.
४) अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), म.रा.नागपूर.
५) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक,
६) सर्व मुख्य वनसंक्षक (प्रादेशिक) / (वन्यजीव)
७) सर्व वनसंरक्षक / सर्व उप वनसंरक्षक (मुख्य वनसंरक्षक (प्रादेशिक/वन्यजीव) यांचेमार्फत)
८) आयुक्त, समाज कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
९) महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता/ लेखा परीक्षा), महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर
१०) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
११) वित्त विभाग, व्यय-१० कार्यासन मंत्रालय, मुंबई.
१२) नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई.
१३) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१४) मा.राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
१५) मा.मंत्री (सामाजिक न्याय) /मा.राज्यमंत्री (सामाजिक न्याय) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय,मुंबई
१६) ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२